स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सवी वर्षाच्या निमित्ताने राज्यात अमृत वन उद्यानांची निर्मीती करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सावनि-२०२३/प्र.क्र.२१/फ-११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:-१० एप्रिल, २०२३

वाचा:- महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक-अंदाज-२०१५/प्र.क्र.३६/फ-११, दिनांक १६ जून, २०१५.

**प्रस्तावना:-**

स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सवी वर्षानिमित्त विविध कार्यक्रमाचे आयोजन करण्यात येत आहे. तसेच शासनामार्फत विविध नाविण्यपूर्ण योजना राज्यात राबविण्यात येत आहेत. सन २०२३-२४ या वर्षाचा अर्थसंकल्प सादर करतांना मा. उपमुख्यमंत्री तथा वित्त मंत्री यांनी केलेल्या घोषणांपैकी राज्यात अमृत महोत्सवी वर्ष साजरे करतांना वन विभागामार्फत अमृत वन उद्यानांची निर्मिती करण्यात येईल अशी घोषणा केलेली आहे. त्यानुषंगाने वन विभागाने अमृत महोत्सवी कार्यक्रमात पुढाकार घेऊन अमृतकाळाच्या सुरुवातीस अमृततुल्य मानल्या जाणाऱ्या औषधी वनस्पती, दुर्मिळ वनस्पतींची व इतर महत्वपूर्ण वृक्षांची लागवड करुन राज्यातील ७५ शहरात अमृत वन उद्यानांची निर्माण करण्याचे प्रस्तावित होते.

सदर अमृत वन उद्यानामुळे शहरी भागातील औद्यौगीकरण, नागरीकरण, वाढती लोकसंख्या, वाहनांमधून बाहेर पडणारे हरितगृह वायू, इत्यादीमुळे वाढते प्रदूषण आणि तापमानात होणारी वाढ या सर्वांचा मानवी आरोग्यावर होणारा विपरित परिणाम कमी करण्यासाठी मदत होईल. तसेच सदर उद्यान दुर्मिळ वनस्पती, औषधी वनस्पती, इतर महत्वपूर्ण व प्राचीन वृक्ष लागवड इत्यादींचे संवर्धन केंद्र बनेल. शहरी भागात या अमृत महोत्सवी वर्षाचे प्रेरणादायी स्मरण प्रत्येक नागरिकांना रहावे तसेच पुढील वाटचालीत स्वातंत्र्याची स्मृती चिरंतन पिढ्यानपिढ्या जागृत ठेवण्याकरीता हे “अमृत वन उद्यान” एक महत्वाचा दीपस्तंभ म्हणून भूमिका बजावेल. सदर बाबी विचारात घेवून अमृतकाळाच्या सुरुवातीस अमृततुल्य मानल्या जाणाऱ्या औषधी वनस्पती, दुर्मिळ वनस्पतींची व इतर महत्वपूर्ण वृक्षांची

लागवड करुन राज्यातील ७५ शहरात "अमृत वन उद्यान" निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सवी वर्षानिमित्त अमृतकाळाच्या सुरुवातीस अमृततुल्य मानल्या जाणाऱ्या औषधी वनस्पती व दुर्मिळ वनस्पतींसह इतर महत्वपूर्ण वृक्षांची लागवड करुन राज्यातील ७५ शहरात अमृत वन उद्यानांची निर्मिती करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. सदर अमृत वन उद्यानांची निर्मिती करतांना पुढील कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

**१) अमृत वन उद्यान निर्मिती करण्याकरीता स्थळ निश्चिती व वृक्ष लागवड**

जिल्ह्यांच्या/तालुक्यांच्या/स्थानिक स्वराज्य संस्थांच्या ७५ ठिकाणी अमृत वन उद्यान निर्माण करण्यासाठी वन जमीन, शासकीय जमीन, संबंधित स्थानिक स्वराज्य संस्था तसेच महामंडळाच्या उपलब्ध असलेल्या (१ ते ५ हेक्टर) क्षेत्राची निवड करण्यात यावी. सदर "अमृत वन उद्यान" निर्मिती ही वनेतर शासकीय जमीनीवर करण्यात आल्यास सदर क्षेत्र नियमानुसार वन विभागाकडे हस्तांतरीत करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. तसेच स्थानिक स्वराज्य संस्था व महामंळाच्या जमीनीवर "अमृत वन उद्यान" निर्मिती करण्यात आल्यानंतर पुढील ७ वर्ष सदर उद्यानाचे संरक्षण व देखभाल ही वन विभागामार्फत करण्यात येवून ७ वर्षाचा कालावधी पूर्ण झाल्यानंतर संबंधित स्थानिक स्वराज्य संस्था/ सेवाभावी संस्था/महामंडळास सदर उद्यान देखभालीसंर्भात हमीपत्र घेवून हस्तांतरीत करण्याची कार्यवाही वन विभागामार्फत करण्यात यावी.

**२) अमृत वन उद्यान निर्माण करण्याकरीता वृक्ष प्रजाती व कालावधी**

"अमृत वन उद्यान" निर्मितीकरीता महाराष्ट्रातील औषधी वनस्पती (मोठे वृक्ष, वेली, झुडपे), दशमूळ वनस्पती, महाराष्ट्रात आढळणाऱ्या दुर्मिळ प्रजाती, महाराष्ट्रातील काही प्रमुख वृक्ष यांची निवड करण्यात यावी. सदर वृक्षांच्या रोपांचा पुरवठा हा वन विभागामार्फत प्रचलित कार्यपध्दतीनुसार करण्यात यावा. सदर योजनेचा कालावधी ही ७ वर्ष (सन २०२३-२४ ते २०२९-३०) इतका असेल.

**३) अमृत वन उद्यानासंबंधी करावयाची अन्य कामे**

"अमृत वन उद्यान" निर्मितीनंतर सदर उद्यानातील रोपवनांच्या बांधील व संरक्षण विषयक कामे ही संबंधित वनक्षेत्रपाल (सामाजिक वनीकरण) यांचेमार्फत करण्यात यावीत. या योजनेचा कालावधी संपल्यानंतर (७ वर्ष) सदर उद्यानांमध्ये अन्य सुविधा उदा. मनोरंजक देखावे, वृक्षांच्या माहितीसंबंधी QR कोड, पॅगोडा, पाहणीकरिता उंच मनोरा, निसर्ग मार्ग, रोपवाटीका, हर्बल गार्डन, पक्षांकरिता घरट्यांची निर्मिती तसेच शारीरिक आरोग्य वर्धनासाठी निसर्ग पायवाट इत्यादी निर्माण करण्याची कार्यवाही शासकीय विविध योजनांनुसार करण्यात यावी.

**४) संनियंत्रण**

अ) "अमृत वन उद्यान" निर्मितीकरीता खर्चाचे अंदाजपत्रक प्रारुप आराखडा, खर्चाचे निकष व प्रारुप अंदाजपत्रक तयार करण्याची कार्यवाही प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या मार्फत करण्यात येवून त्यास प्रधान मुख्य वन संरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी अंतिम मान्यता प्रदान करावी.

आ) "अमृत वन उद्यान" निमिर्तीकरीता स्थळ निश्चिती बाबतची कार्यवाही संबंधित मुख्य वनसंरक्षक यांनी करावी. संबंधित वन विभाग प्रमुख (प्रादेशिक)/(सामाजिक वनीकरण) यांच्याकडून प्रस्तावांना आवश्यक तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात यावी.

इ) "अमृत वन उद्यान" निर्मिती करीता वनपरिक्षेत्र अधिकारी (सामाजिक वनीकरण) हे अंमलबजावणी अधिकारी राहतील.

**५) योजनेसाठी आवश्यक निधीचा स्त्रोत**

अ) सदर "अमृत वन उद्यान" निर्मितीच्या प्रस्तावास प्रचलित मापदंडानुसार प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्राप्त झाल्यानंतर "अमृत वन उद्यान" निर्मितीचा खर्च हा खालील नमूद लेखाशिर्षामधून भागविण्यात यावा.

**मागणी क्र.सी-१०,**
**४४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च,**
**(००)(०६) सामुहिक पातळीवर ठोस वनरोपन (४४०६ ०४९२)**
**०२- मजूरी, २१- साहित्य व पुरवठा**

आ) ज्या ठिकाणी व्यावसायीक सामाजिक जबाबदारी (CSR) च्या माध्यमातून अथवा अशासकीय संस्था, औदयोगिक क्षेत्र यांच्या मदतीने “अमृत वन उद्यान” निर्मितीचा खर्च करणे शक्य असेल त्या ठिकाणी प्रचलित त्रिपक्षीय करारपध्दतीचा अवलंब करून “अमृत वन उद्यान” निर्मितीचा खर्च भागविण्यात यावा.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०४१०१९५६०११४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

INGALE VINAYAK BALASAHEB

Digitally signed by INGALE VINAYAK BALASAHEB
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=4282a00b0a0507f339edd9409eebc43f466c57e6ec219f022cb4d8e9d79999ec, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B9DD74802C0E9E87CDD582D1AEA8DC4506C60DEA869DFE0B71557BF4A56623D7, cn=INGALE VINAYAK BALASAHEB
Date: 2023.04.10 20:01:20 +05'30'

**(विनायक बा. इंगळे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८. मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद/विधानसभा, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
९. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१०. मा. उपाअध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
११. सर्व सन्माननीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य
१२. मुख्य सचिव, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१३. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
१४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

१६. प्रधान मुख्य वनसंरक्षक (सामाजिक वनीकरण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१७. मुख्य वनसंरक्षक/ वनसंरक्षक (प्रादेशिक) (११ वृत्त)
१८. वनसरंक्षक, सामाजिक वनीकरण (६ वृत्त)
१९. उप वनसंरक्षक (प्रा) (सर्व)/विभागीय वन अधिकारी (प्रा)/उपविभागीय वन अधिकारी (प्रा)
२०. विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण (सर्व जिल्हे)
२१. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर,
२२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२
२४. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
२५. वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
२६. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२७. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२८. उप सचिव/अवर सचिव(सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२९. निवडनस्ती फ-११.